**सुरक्षा रक्षक मंडळामार्फत सुरक्षा रक्षकांच्या वेतनातुन राष्ट्रीयकृत बँक, सहकारी बँक व पतसंस्थाकडून घेतलेल्या कर्जाच्या हप्त्याची कपात न करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.एसजीए-२०१६/प्र.क्र.०४/कामगार-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१८

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्र.एसजीए-२०११/प्र.क्र.२८१३/कामगार-५, दि.१७.०३.२०१२
२) शासन निर्णय क्र.एसजीए-२०११/प्र.क्र. २८१३/कामगार-५, दि.२९.०१.२०१३
३) शासन निर्णय क्र.एसजीए-२०१७/प्र.क्र.८९/कामगार-५, दि.१८.१०.२०१७

**प्रस्तावना -**

शासनाने संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ व २ अन्वये सुरक्षा रक्षक मंडळामध्ये नोंदीत असलेल्या सुरक्षा रक्षकांना राष्ट्रीयकृत बँका, सहकारी बँका तसेच पतसंस्थांकडून कर्ज घ्यावयाचे झाल्यास अशा कर्जाची कपात मंडळामार्फत करण्यासंदर्भात तसेच सुरक्षा रक्षकांना पतसंस्थेव्यतिरिक्त त्यांच्या भविष्यनिर्वाह निधीखात्यामध्ये जमा असलेल्या रकमेतुन कर्ज घ्यावयाचे झाल्यास मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आली आहेत.

त्याचप्रमाणे संदर्भाधीन क्र.३ मधील शासन निर्णयान्वये मंडळातील नोंदीत सेवानिवृत्त व मृत पावलेल्या सुरक्षा रक्षकांच्या अंतिम देय रक्कमेच्या कर्जाची रक्कम व व्याजाची रक्कम त्यांच्या उपदान व भविष्यनिर्वाह निधींमधून न करण्यासंदर्भात निर्णय घेतला आहे. सुरक्षा रक्षकांच्या वेतनातुन कर्जाच्या हप्त्याच्या कपातीबाबत विविध संघटनांकडून तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत.

तसेच महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील कलम ४९ अन्वये सुरक्षा रक्षक मंडळे मालक या संज्ञेत येत नसल्यामुळे अशा मंडळांना वेतनातुन उक्त वित्तीय संस्थांमार्फत कपात करुन देता येईल किंवा कसे, त्याचप्रमाणे कर्ज मंजूर करीत असताना सुरक्षा रक्षक, पतपेढी/बँक, सुरक्षा रक्षक मंडळ अशा तिघांचा त्रिपक्ष करार करणे याबाबत विधीवत छाननी करुन निर्णय घेण्याची बाब तसेच मंडळ मालक या संज्ञेत मोडत नसल्यास मंडळाचा वित्तीय संस्था व सुरक्षा रक्षक यांच्यासमवेत करारामध्ये समावेश झाल्यास कर्जाचे दायित्व घेण्याची जबाबदारी मंडळावर येऊ शकते. या संदर्भात विधी व न्याय विभागाने दिलेले अभिप्राय पुढीलप्रमाणे आहेत-

" It is, thus, seen that employer in relation to security guards is the agency or agent when in its direct employment and deployed in a factory or establishment through the agency or agent. Principal employer is the person who has the ultimate control over the affairs of the factory or establishment. It is, thus, obvious that the Board does not fall within the ambit of term 'employer' or 'principal employer', as defined in the Act "

" As per Section ४९ of the Maharashtra Cooperative Societies Act, १९६०, the employer shall, if so required by requisition in writing and on receipt of a copy of agreement executed in favour of the society by its member providing that his employer shall be competent to deduct form the salary or wages payable to him by the employer, such total amount payable to the society and in such instalments, as may be specified in the agreement, make the deduction in accordance with the agreement and pay the amount so deducted to the society. Considering the definitions of the term 'employer' given in the Act, it cannot be said that the Board comes under the definition of the term 'employer', as used in Section ४९."

विधी व न्याय विभागाचे दिलेले अभिप्राय व महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील तरतुद पाहता शासन संदर्भाधीन क्र.१ व २ शासन निर्णय अधिक्रमित करुन शासन नोंदित सुरक्षा रक्षकांच्या वेतनातुन होणा-या कपातीबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**<u>शासन निर्णय</u> :-**

सुरक्षा रक्षक मंडळे ही मालक या संज्ञेत मोडत नसल्यामुळे सुरक्षा रक्षकांच्या वेतनातुन राष्ट्रीयकृत बँक, सहकारी बँक व पतसंस्थेच्या कर्जाच्या हप्त्याची कपात मंडळाद्वारे भरणे विधीवत ठरत नाही. मंडळाने सुरक्षा रक्षकांकडून त्यांच्या वेतनातुन उक्त वित्तीय संस्थांमार्फत घेतलेल्या कर्जाची रक्कम कपात करणे हे महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील कलम ४९ अन्वये असलेल्या तरतुदीमध्ये मोडत नाहीत. त्याप्रमाणे अन्य कोणत्याही नियमात अशी तरतुद नसल्यामुळे राष्ट्रीयकृत बँक, सहकारी बँक व पतसंस्थेच्या कर्जाच्या हप्त्याची कपात सुरक्षा रक्षकांच्या वेतनातुन सुरक्षा रक्षक मंडळामार्फत करण्यात येऊ नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा सांकेतांक क्र २०१८०९२८१६४६४१४४१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dr.Shrikant L. Pulkundwar

Digitally signed by Dr.Shrikant L. Pulkundwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, serialNumber=c10a1e6c8fbe08c1180978bd3ed8a151ed05202d522b09b9960341c2f080906d, cn=Dr.Shrikant L. Pulkundwar
Date: 2018.09.28 16:52:52 +05'30'

**( डॉ.श्री.ल.पुलकुंडवार)**
शासनाचे उप सचिव.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

४. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, अ-६, मंत्रालय समोर,नरिमन पॉईट, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई,
१०. कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा, मुंबई,
११. सर्व सह/ उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सह कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा, मुंबई,
१३. कामगार उप आयुक्त, कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा, मुंबई
१४. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१५. अध्यक्ष, सर्व माथाडी मंडळे,
१६. सर्व अवर सचिव /कार्यासन अधिकारी, कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई,
१७. निवड नस्ती (कामगार-५).